**जिल्हा परिषद व पंचायत समिती निवासी इमारत बांधकामासाठी स्वतंत्र/लेखाशीर्ष उघडण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/प्र.क्र.७०/पंरा-७
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
**दिनांक : ५ नोव्हेंबर, २००९**

**संदर्भ** - १) नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र. ८०/का.१४४३, दिनांक १९.५.२००९
२) वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र.१५८/०९/अर्थ-१७, दिनांक २१.५.२००९

**शासन निर्णय :-**

ग्राम विकास व जलसंधारण विभागार्फत जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी बांधकामाकरिता मागणी क्र.०३, २५१५ ००५३ या लेखाशिर्षाखाली जिल्हा परिषदांना सहायक अनुदान वितरीत करण्यात येते. नियोजन विभागाने योजना प्रणालीअंतर्गत जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता २५१५००५३ हे मूळ लेखाशिर्ष ठेवण्यास व निवासी इमारत बांधकामाकरीता स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्यास संदर्भीय अनौपचारीक संदर्भान्वये मान्यता दिली आहे. तसेच जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता २५१५००५३ हे मूळ लेखाशिर्ष ठेवण्यास व निवासी इमारत बांधकामाकरीता २५१५ १२५६ हे लेखाशिर्ष उघडण्यास वित्त विभागाने संदर्भीय अनौपचारीक संदर्भान्वये मान्यता दिली आहे. त्यानुसार सन २००९-१० या आर्थिक वर्षापासून इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, मागणी क्र. एल-०३ अंतर्गत जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता २५१५००५३ हे मूळ लेखाशिर्ष ठेवण्यास व निवासी इमारत बांधकामाकरीता २५१५ १२५६ हे खालील प्रमाणे लेखाशिर्ष उघडण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| **मागणी क्र. एल - ०३** | **Demand No. L- 03** |
| **२५१५, इतर ग्रामीण विकास कार्यक्रम,** | **(1) 2515 – Other Rural Development Programme** |
| **००** | **00** |
| **१०१, पंचायती राज,** | **101-panchayati Raj** |
| **००** | **00** |
| **(०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारत बांधकामासाठी सहाय्यक अनुदान ( २५१५ १२५६)** | **05 – Grant in Aid to Zilla parishads for Construction of Residential Buildings (2515 1256)** |
| **३१ सहाय्यक अनुदाने,** | **31 –Grsnts in Aid** |

२. हा शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांच्या संदर्भीय अनौपचारिक संदर्भान्वये दिलेल्या सहमतीस तसेच महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. टीएम/सीएच.१ /आरडीडब्लुसीडी / अनौ./१११४, दिनांक २९.१०.२००९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सर्व संबधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी वरील नविन लेखाशिर्षाबाबतची नोंद घेवून, ज्या लेखाशिर्षाखाली कामाचे सहायक अनुदान वितरीत करण्यात आले/येईल, त्यावरील खर्चाच्या नोंदी त्याच लेखाशिर्षाखाली दर्शविण्याची दक्षता घ्यावी.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर (वेबसाईटवर) उपलब्ध करण्यात आल्या असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२००९११०७१२४९१९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त (सर्व विभाग)
२) महालेखापाल, महाराष्ट्र - १ मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, सर्व जिल्हा परिषद,
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), सर्व जिल्हा परिषदा,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे
७) मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
८) वित्त विभाग, (व्यय १५/अर्थ.१७), मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
९) नियोजन विभाग (का.क्र.१४४३/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१०) सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
११) का.क्र. वित्त - १ व योजना - ७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती, कार्यासन क्र.पं.रा.-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई